**एकरुख उपसा सिंचन योजना , जि. सोलापूर या प्रकल्पाच्या रुपये ४१२.८० कोटी इतक्या किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एकरुख ०११४/प्र.क्र. ३१/२०१४/मोप्र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १४/०८/२०१८

**संदर्भ**:-.१) म.कृ.खो.वि.म. यांचा निर्णय क्र. एकरु ख उसिंयो /२९६/(३६४/९६) प्रशा-२ / ५०८८ दि. २१.१२.१९९६

**प्रस्तावना :**

एकरुख उपसा सिंचन योजना महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळांतर्गत उर्वरित महाराष्ट्र प्रदेशामध्ये आहे. एकरुख उ.सिं.यो.चा उद्भव मौजे हिप्परगा ता. उत्तर सोलापूर, जि. सोलापूर येथील एकरुख मध्यम प्रकल्पाच्या तलावामध्ये आहे. यासाठीच्या पाण्याची तरतूद भीमा(उजनी) प्रकल्पाच्या जलनियोजनामध्ये असून योजनेसाठी आवश्यक पाणी भीमा (उजनी) प्रकल्पाच्या डाव्या कालव्यांतर्गतच्या मोहोळ-कारंबा शाखा कालव्याच्या शेवटी असणा-या कारंबा पंपगृहाव्दारे उपसा करुन उत्तर सोलापूर तालुक्यातील हिप्परगा येथील एकरुख मध्यम प्रकल्पात सोडणे नियोजित आहे. एकरुख उसिंयोव्दारे एकरुख तलावामधून दोन टप्प्यात पाणी उपसा करुन त्यानंतर दर्गनहळ्ळी कालव्याद्वारे दक्षिण सोलापूर तालुक्यातील अवर्षणप्रवण २१ गावातील ७२०० हे. क्षेत्रास सिंचन लाभ देणे तसेच दर्शनाळ कालव्याद्वारे हरणा नदीमार्गे बोरी मध्यम प्रकल्पासाठी १.२७५ अब्ज घन फूट पाणी उपलब्ध करुन देणे नियोजित आहे. प्रकल्पांतर्गत पंपगृहे, उर्ध्वगामी नलिका, कालवे व वितरण व्यवस्था या घटकांचा समावेश आहे.

सदर प्रकल्पास संदर्भ १ अन्वये सन १९९५-९६ चे दरसुचीवर आधारित रु. ८७.४८ कोटी किंमतीसाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

प्रशासकीय मान्यतेनंतर प्रामुख्याने दरसुचीत वाढ झाल्याने, भूसंपादन खर्चात वाढ झालेने, तसेच संकल्पनातील बदल व मूळ प्रकल्प अहवालातील अपु-या तरतुदी यामुळे प्रकल्प किंमतीत वाढ झाली आहे. त्यामुळे महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाने प्रथम सुधारीत प्रकल्प अहवाल मान्यतेस्तव शासनास सादर केला आहे. या प्रकल्प अहवालास राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-२ यांनी दहाव्या बैठकीमध्ये शिफारस केली आहे. तसेच प्रकल्प अहवालावर दि. २३/४/२०१८ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीचे बैठकीत चर्चा झाली आहे.

व्यय अग्रक्रम समितीने वाढीची कारणमिमांसा, राज्य तांत्रिक सल्लागार समितीचा अहवाल, व्यय अग्रक्रम समितीची निरिक्षणे तसेच प्रकल्पातील कामाच्या अनुषंगाने, सोलापूर जिल्हयातील दक्षिण सोलापूर तालुक्याला वरदान ठरणाऱ्या एकरुख उपसा सिंचन योजनेचे काम पूर्णत्वास नेण्याच्या उद्देशाने, सन २०१३-१४ च्या दरसुचीवर आधारीत रुपये ४१२.८० कोटी इतक्या किंमतीच्या प्रथम सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :**

एकरुख उपसा सिंचन योजना जि. सोलापूर या प्रकल्पाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०१३-१४ च्या दरसुचीवर आधारीत रुपये ४१२.८० कोटी (रुपये चारशे बारा कोटी ऐंशी लक्ष फक्त) इतक्या किंमतीस प्रत्यक्ष कामासठी रुपये ३८०.८५ कोटी (रुपये तीनशे ऐंशी कोटी पंच्याऐंशी लक्ष फक्त) व अनुषंगीक खर्च ३२.५५ कोटी (रुपये बत्तीस कोटी पंच्चावन्न लक्ष फक्त ) खालील अटींच्या अधीन राहून प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्षनिहाय तरतूदीचा गोषवारा सोबत जोडला आहे.

एकरुख उपसा सिंचन योजनेची १०,००० हेक्टर सिंचन क्षमता जून २०१९ पर्यंत निर्माण करावी.

१. भूसंपादन प्रकरणांचे दायित्व, वितरण व्यवस्थेची कामे व महत्तम सिंचन निर्मिती करण्यासाठी प्राधान्याने निधीचा विनियोग करावा.

२. प्रचलीत शासन धोरणानुसार तांत्रीक दृष्टया शक्य तेथे बंदीस्त नलिका प्रणालीचा वापर करावा जेणेकरुन भूसंपादनावरील खर्चात बचत होईल.

३. कालव्याची व वितरणव्यवस्थेची कामे सलगतेने करावीत व सिंचन उदिष्ट साध्य करावे.

४. पुर्ण लाभक्षेत्रामध्ये पाणी वापर संस्था स्थापन करुन सिंचन व्यवस्थापन पाणी वापर संस्थेस हस्तांतरित करावे.

५. सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वयीकरनाचे विविध टप्प्यावर क्षेत्रिय अधिका-यांनी घेतलेल्या विविध निर्णयास व क्षेत्रिय अनियमितता झाली असल्यास अशा अनियमिततेस सहमती आहे, असे गृहीत धरता येणार नाही.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, (८०)सर्वसाधारण, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०२) योजनांतर्गत, (०२) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (उर्वरित महाराष्ट्र) (संगणक संकेतांक ४७०१ एच-६२९) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय दिनांक २३ /०४/२०१८ रोजी व्यय अग्रक्रम समितीने घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८१४१२५७४२२९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sharad Shankar Dabhadkar

Digitally signed by Sharad Shankar Dabhadkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=531ee7ca7a2d3a1d0ad6391d978b4614a6f407abdc7276384df12925c283058f, cn=Sharad Shankar Dabhadkar
Date: 2018.08.14 13:06:12 +05'30'

**(श.शं. दाभाडकर)**
**शासनाचे अवर सचिव**

सहपत्र: परिशिष्ट “अ”

**प्रत-**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.

## परिशिष्ट "अ"
## एकरुख उपसा सिंचन योजना
## किंमतीचा उपशीर्ष निहाय गोषवारा

(किंमत रु.लक्ष)

| उपशिर्ष | मंजूर प्रमा नुसार तरतुद | प्रथम सुप्रमा नुसार तरतुद | वाढ/घट (+/-) | मार्च २०१६ अखेर झालेला खर्च | उर्वरित किंमत |
|---|---|---|---|---|---|
| (A) शिर्ष कामे | | | | | |
| ए-प्राथमिक कामे | ३.११ | १०.७५ | ७.६४ | ९.७५ | १.०० |
| बी-जमीन | २.५४ | १७७.६९ | १७५.१५ | ८०.४८ | ९७.२१ |
| सी-कामे | ५०१०.०० | ८१२५.९१ | ३११५.९१ | ६७८२.९२ | १३४२.९९ |
| के-इमारत | ४८.०५ | ३१३.६० | २६५.५५ | ०.०० | ३१३.६० |
| एम-वनीकरण | ०.७५ | १७.०६ | १६.३१ | ०.०० | १७.०६ |
| ओ-संकिर्ण | १३.०४ | २२.१६ | ९.१२ | ०.०० | २२.१६ |
| पी-देखभाल | ६.२८ | ८५.५६ | ७९.२८ | ०.०० | ८५.५६ |
| क्यु-हत्यारे व संयंत्रे | २८.४० | ०.०० | (-) २८.४० | ०.०० | ०.०० |
| आर-दळणवळण | १०.०० | ११६.२३ | १०६.२३ | ०.०० | ११६.२३ |
| एक्स-इनव्हायरमेंट | ०.०० | ५५.३९ | ५५.३९ | १३.३९ | ४२.०० |
| **एकूण (A)** | **५१२२.१७** | **८९२४.३५** | **३८०२.१८** | **६८८६.५४** | **२०३७.८१** |
| **B) कालवे व वितरण व्यवस्था :** | | | | | |
| ए-प्राथमिक कामे | २.३५ | २५.२८ | २२.९३ | १५.२८ | १०.०० |
| बी-जमीन | ४९.०९ | १३९१७.१३ | १३८६८.०४ | २८२.५५ | १३६३४.५८ |
| सी-कामे | ४८१.५६ | १९५९.९६ | १४७८.४० | ०.०० | १९५९.९६ |
| डी-विमोचक | ११.१३ | २५४.४० | २४३.२७ | ०.०० | २५४.४० |
| एफ-आर.एच. टी. वर्क्स | २४६.०० | २१०३.३६ | १८५७.३६ | १७१५.४० | ३८७.९६ |
| जी-ब्रिजेस | २४.५७ | ८६४.८४ | ८४०.२७ | ५५४.२८ | ३१०.५६ |
| एच-एस्केप. | ०.९९ | ६७.९३ | ६६.९४ | ०.०० | ६७.९३ |
| के-इमारती | ३१.७४ | ०.०० | (-) ३१.७४ | ०.०० | ०.०० |
| एल-मातीकाम | ६५७.१८ | ३०७२.६३ | २४१५.४५ | २३२६.२१ | ७४६.४२ |

| उपशिर्ष | मंजूर प्रमा नुसार तरतुद | प्रथम सुप्रमा नुसार तरतुद | वाढ/घट (+/-) | मार्च २०१६ अखेर झालेला खर्च | उर्वरित किंमत |
|---|---|---|---|---|---|
| एम-वनीकरण | १५.५४ | ७४.७५ | ५९.२१ | ०.०० | ७४.७५ |
| ओ-संकिर्ण | २.५५ | १४.७३ | १२.१८ | ०.०० | १४.७३ |
| पी-देखभाल | २.०० | ८३.२३ | ८१.२३ | ०.०० | ८३.२३ |
| क्यु-हत्यारे व संयंत्रे | २०.४६ | ०.०० | (-) २०.४६ | ०.०० | ०.०० |
| आर-दळणवळण | ७.०० | ०.०० | (-) ७.०० | ०.०० | ०.०० |
| यु-वितरीका | २७६ | ५०१९.२९ | ४७४३.२९ | २२.८९ | ४९९६.४० |
| व्ही-शेतचारी | ४३.२० | १३९२.०० | १३४८.८० | ०.०० | १३९२.०० |
| डब्ल्यु-निचराचारी | ९.७२ | २५२.०० | २४२.२८ | ०.०० | २५२.०० |
| **एकूण (B)** | **१८८१.०८** | **२९१०१.५३** | **२७२२१.९४** | **४९१६.६१** | **२४१८४.९२** |
| **(C) एकुण कामे (A+B)** | **७००३.२५** | **३८०२५.८८** | **३१०२२.६३** | **११८०३.१५** | **२६२२२.७३** |
| **(D) आस्थापना व इतर** | १७४४.३० | ३२५४.३२ | १५१०.०२ | १०१८.८५ | २२३५.४७ |
| **एकुण एकंदर (C+D)** | **८७४७.५५** | **४१२८०.२०** | **३२५३२.६५** | **१२८२२.००** | **२८४५८.२०** |

Sharad Shankar Dabhadkar

Digitally signed by Sharad Shankar Dabhadkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=531ee7ca7a2d3a1d0ad6391d978b4614a6f407abdc7276384df12925c283058f, cn=Sharad Shankar Dabhadkar
Date: 2018.08.14 13:06:43 +05'30'

**( श.शं. दाभाडकर )**
**शासनाचे अवर सचिव**